**सन २००९-२०१० या शैक्षणिक वर्षात अकरावी व बारावी इयत्तेत असलेल्या मागासवर्गीय (अनु. जमाती वगळून) विद्यार्थ्यांच्या जातीच्या प्रमाणपत्राची तपासणीसाठी मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,
शासन निर्णय क्रमांक सीबीसी १० /२०१०/ प्र.क्र. ५५ / मावक ५
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०००३२
दिनांक : ४ फेब्रुवारी , २०१०

**वाचा :-** शा. नि. वि. जा. भ. ज. इ. मा. व. व वि. मा. प्रवर्ग कल्याण विभाग क्र.सीबीसी-२०००/२५२/ प्र.क्र.१/इमाव ५, दिनांक २५.१.२०००

**प्रस्तावना**:- अनुसूचित जाती/विमुक्त जाती/भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग जातीच्या विदयार्थ्यांनी विज्ञान शाखेच्या इयत्ता अकरावी व बारावी मध्ये शिकत असलेल्या सर्व विद्यार्थ्यांच्या जाती प्रमाणपत्राची वैधता तपासण्यासाठी संबंधित शैक्षणिक संस्थांकडे अर्ज करण्याची अंतिम मुदत शासन निर्णय दिनांक २५ जानेवारी, २००० अन्वये दिनांक ३० नोव्हेंबर पर्यंत होती. तथापि या कालावधीमध्ये २००९-२०१० या शैक्षणिक वर्षात इयत्ता अकरावी व बारावीमध्ये शिकत असलेल्या काही मागासवर्गीय विद्यार्थ्यांनी वरील निर्धारित मुदतीत अर्ज सादर केले नसल्याने किंवा अपरिहार्य कारणामुळे त्यांना ते शक्य झाले नसल्याने, अशा विद्यार्थ्यांची केवळ त्यांच्या जाती प्रमाणपत्राची तपासणी न झाल्यामुळे त्यांचे शैक्षणिक वर्ष वाया जाऊ नये म्हणून मुदतवाढ देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-** सन २००९-२०१० या शैक्षणिक वर्षात अकरावी व बारावी विज्ञान शाखेत शिकत असलेल्या अनुसूचित जाती, विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्गाच्या विद्यार्थ्यांनी दिनांक २५ जानेवारी, २००० मध्ये विहित मुदतीत जाती प्रमाणपत्राच्या तपासणीसाठी अर्ज सादर केले नाहीत व सन २०१०-२०११ या शैक्षणिक वर्षात वैद्यकिय, अभियांत्रिकी, वास्तुशास्त्र व औषध निर्माणशास्त्र या अभ्यासक्रमासाठी प्रवेश घेऊ इच्छितात अशा विद्यार्थ्यांनी आपल्या जाती प्रमाणपत्राची पडताळणी करुन घेण्यासाठी खालील प्रमाणे वाढीव मुदतीबाबत कार्यपध्दती विहित करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १ | जे विद्यार्थी सन २००९-२०१० या शैक्षणिक वर्षात विज्ञान शाखेच्या इयत्ता ११ वी १२ वी मध्ये शिकत आहेत. त्यांनी संबंधित महाविद्यालयामार्फत आपले अर्ज संस्थेच्या प्राचार्यांकडे सादर करावयाचा अंतिम दिनांक | **दि. २८ फेब्रुवारी, २०१०** |
| २ | शैक्षणिक संस्थेने असे प्रस्ताव संबंधित विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी यांचेकडे पाठवावयाचा अंतिम दिनांक | **दि. ०८ मार्च , २०१०** |
| ३ | विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी यांनी संबंधित विभागीय जाती प्रमाणपत्र पडताळणी समितीकडे पाठविण्याचा अंतिम दिनाक | **दि. १५ मार्च , २०१०** |
| ४ | समितीने अर्ज तपासून द्यावयाचा अंतिम दिनांक | **दि. १० जून,२०१०** |

२.	शैक्षणिक संस्थेकडे तसेच विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकाऱ्यांकडे प्राप्त पडताळणी प्रकरणे एकत्रितरित्या अंतिम तारखेला न पाठविता, ते जसे प्राप्त होतील तसे तातडीने पुढे सादर करावीत.

३.	शासन असेही आदेश देत आहे की, जर या उशीरा आलेल्या अर्जापैकी इयत्ता १२ वी मध्ये शिकत असलेल्या काही विद्यार्थ्यांचा जातीचा दावा संशयास्पद असल्यास व त्यामुळे दावा तपासण्यास उशीर झाला व पर्यायाने संबंधित विद्यार्थ्यास वैद्यकीय, अभियांत्रिकी, वास्तुशास्त्र व औषधी निर्माण शास्त्र या अभ्यासक्रमासाठी महाविद्यालयात पुढील शैक्षणिक वर्षामध्ये पदवी अभ्यासक्रमासाठी प्रवेशाबाबत काही अडचणी निर्माण झाल्यास, अथवा **प्रवेश मिळू शकला नाही तर त्याची जबाबदारी जाती प्रमाणपत्र तपासणी समितीवर अथवा शासनावर रहाणार नाही असे संबंधित विद्यार्थ्यांकडून लेखी घेऊन नंतरच असे अर्ज तपासणीसाठी स्विकारावेत.**

४.	माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाने या शासन निर्णयास राज्यस्तरावरील प्रमुख दैनिके, जिल्हा स्तरीय /स्थानिक दैनिके, आकाशवाणी व दूरदर्शनवरुन प्रसिध्दी देण्याची व्यवस्था करावी.

५.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक **२०१००२०४१६३४५००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**(व. दा. राठोड)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य,पुणे
संचालक, विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
सर्व विभागीयआयुक्त, (महसूल), अतिरिक्त आयुक्त (महसूल), अप्पर जिल्हाधिकारी (भाप्रसे) मुंबई उपनगर, पुणे, नागपूर,
जाती प्रमाणपत्र पडताळणी समिती १ व २, मुंबई, पुणे, नाशिक, नागपूर, औरंगाबाद, अमरावती व लातूर,
सहसंचालक (जा.प्र.त.) समाजकल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
विभागीय साजकल्याण अधिकारी (जा.प्र.प.समिती) मुंबई, पुणे, नाशिक, नागपूर, औरंगाबाद व अमरावती, लातूर
सर्व विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी
संचालक,वैद्यकीय शिक्षण व संशोधन,मुंबई
संचालक, तंत्र शिक्षण, मुंबई
संचालक, आयुर्वेद संचालनालय, वरळी, मुंबई
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय,मंत्रालय, मुंबई
प्रत :-	प्रधान सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.

त्यांना विनंती करण्यात येते की, **त्यांनी त्यांच्या अधिपत्याखालील सर्व शैक्षणिक संस्थांना वरील विद्यार्थ्यांचे जाती प्रमाणपत्र पडताळणीचे अर्ज स्विकारुन आवश्यक त्या प्रमाणपत्रांसह संबंधित जाती प्रमाणपत्र समितीकडे विहित मुदतीत अर्ज सादर करण्याच्या सूचना तात्काळ निर्गमित कराव्यात. तसेच या सूचना वेबसाईट वर सुध्दा त्यांच्या स्तरावरुन प्रसिध्द कराव्यात.**